महाराष्ट्र विधानसभा आश्वासन समितीच्या अहवालांतील शिफारशींच्या अंमलबजावणीबाबत.

महाराष्ट्र शासन
संसदीय कार्य विभाग
शासन परिपत्रक क्रमांक : विसआ-२०१८/२२४/प्र.क्र.१०७/सहा
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १८ ऑगस्ट, २०१८.

वाचा :- १) शासन परिपत्रक, संसदीय कार्य विभाग, क्रमांक : विसआ-२०१६/प्र.क्र.११/सहा, दिनांक २६ मे, २०१६ व दि.१६ नोव्हेंबर २०१६.
२) शासन परिपत्रक क्रमांक : विसआ-२०१८/प्र.क्र.७९/सहा, दिनांक २२ मे, २०१८.
३) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय यांचे पत्र क्रमांक : २०७३२/ विसआस/ड-१४, दिनांक ६/८/२०१८.

शासन परिपत्रक :-

सन १९९३ चे दुसरे (पावसाळी) ते सन २०१४ च्या दुसऱ्या (पावसाळी) अधिवेशनातील उर्वरित प्रलंबित आश्वासनांसंबंधीचा विधानसभा आश्वासन समितीचा नववा अहवाल दिनांक १९ जुलै, २०१८ रोजी विधानसभेत सादर करण्यात आला आहे. विधानसभा आश्वासन समितीने त्यांच्या अहवालात मंत्रालयीन विविध विभागांनी केलेल्या आश्वासन पूर्ततेच्या अनुषंगाने अभिप्रायात्मक टिप्पणी करुन काही शिफारशी केलेल्या आहेत. त्या सारांशाने पुढीलप्रमाणे आहेत :-

१) आश्वासनांच्या पूर्ततेची माहिती विहीत मुदतीत म्हणजे ९० दिवसाच्या आत प्रशासकीय विभागांनी सादर करणे आवश्यक आहे. ज्या प्रकरणात न्यायालयीन अडथळे आहेत अथवा पूर्ततेबाबत काही अडचणी आहेत अशा बाबीदेखील शासनाने समितीच्या निदर्शनास आणून देणे आवश्यक आहे. म्हणून यासाठी शासनाने एक सर्वंकष निर्णय घेऊन या आश्वासनांच्या पूर्ततेबाबत संबंधित विभागाचे उप सचिव तथा सह सचिव यांच्यावर जबाबदारी निश्चित करुन आश्वासन पूर्ततेसंदर्भात जाणीवपूर्वक दिरंगाई झाल्यास अशा अधिकाऱ्यांविरुद्ध ठोस कारवाई करण्यासंदर्भात निर्णय घेण्यात यावा. तसेच दर तीन महिन्याला संबंधित विभागाच्या विभाग प्रमुखांनी म्हणजेच सचिव / प्रधान सचिव यांनी त्यांच्या विभागाच्या संबंधित उप सचिव / सह सचिव यांचे समवेत आश्वासनांच्या पूर्ततेबाबतच्या आढावा बैठका घेऊन मा. मंत्री महोदयांनी सभागृहात दिलेल्या आश्वासने / अभिवचने संदर्भात जी आश्वासने / अभिवचने सहज पूर्ण करणे शक्य आहे, अशा बाबतीत त्वरेने निर्णय घेऊन त्याबाबतचे विवरणपत्र संसदीय कार्य विभागामार्फत सभागृहाला पाठविण्याची कार्यवाही तत्परतेने व त्वरेने करावी. तसेच, याबाबत केलेल्या कार्यवाहीची माहिती समितीला एक महिन्यात पाठविण्यात यावी.

२) विधानसभेच्या नियमानुसार आश्वासनांच्या पूर्ततेबाबत शासनास ९० दिवस इतक्या कालावधीची मर्यादा घालून दिली आहे. सदर मर्यादेचे उल्लंघन कोणत्याही परिस्थितीत होता कामा नये, यासाठी संबंधित अधिकाऱ्यांवर जबाबदारी निश्चित केल्यास बहुतांश

आश्वासनांची पूर्तता ही वेळेत किंबहुना वेळेच्या आधीदेखील होऊ शकते असे समितीचे ठाम मत आहे. सबब, आश्वासनांचे विवरणपत्र सभागृहाच्या पटलावर विहित कालावधीत ठेवण्यासाठी शासनाने कडक धोरण आखावे. आश्वासनांची पूर्तता जाणीवपूर्वक व हेतूपुरस्सरपणे विलंबाने करणाऱ्या संबंधित विभागाच्या उप सचिव / सह सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यांवर जबाबदारी निश्चित करण्यात येऊन त्यांचेविरुद्ध शिस्तभंगाची कार्यवाही करण्यासंदर्भात शासनाने सर्वंकष निर्णय घेऊन यासंदर्भात तातडीने परिपत्रक निर्गमित करावे व त्याबाबतचा अहवाल समितीला एक महिन्याच्या आत सादर करावा. तसेच, आश्वासनांचा विषय व आशयाच्या अनुषंगाने आश्वासनांच्या पूर्ततेची कार्यवाही त्वरित करणे शक्य आहे अशा प्रकरणी सुसंगत व परिपूर्ण कार्यवाही करण्याची दक्षता प्रशासकीय विभागांनी घेणे आवश्यक आहे. अशा कार्यवाहीचा अहवाल समितीला १ महिन्यात पाठवावा.

३) आश्वासनांच्या पूर्ततेबाबत मंत्रालयीन विभागांकडून समितीपुढे ठेवण्यासाठी पाठविण्यात येणाऱ्या विवरणपत्रात आश्वासनांचे विषय, मंत्री / राज्यमंत्री महोदयांकडून सभागृहात देण्यात आलेले आश्वासने व करण्यात आलेल्या कार्यवाहीबाबतचा विभागाने केलेला उल्लेख यामध्ये बऱ्याच वेळेला विसंगती व तफावत आढळून येत असते. आश्वासनांचा विषय व त्याच्या पूर्ततेबाबतदेखील तफावत दिसून येत असते. याचाच अर्थ संबंधित अधिकारी हे वेळ मारुन नेण्यासाठी समितीपुढे हलगर्जीपणाने आश्वासनांची पूर्तता करीत असतात. आश्वासनांची पूर्तता ही विषयाच्या अनुषंगाने सुसंगत व परिपूर्ण असणे आवश्यक आहे. समितीच्या बैठकीत पहिल्या वाचनाच्या वेळी आढळून येणाऱ्या त्रुटींबाबत समिती गांभीर्याने घेत असून यापुढील काळात समितीसमोर ठेवण्यात येणाऱ्या आश्वासनांच्या पूर्ततेबाबतची विवरणपत्रे ही कोणत्याही परिस्थितीत मा. मंत्री महोदयांनी सभागृहात दिलेल्या आश्वासनांशी सुसंगत व आश्वासनांच्या कक्षेत असल्याबाबत खात्री करुनच समितीकडे परिसृत करावीत व यासंदर्भात शासनाने सर्वंकष परिपत्रक त्वरेने निर्गमित करुन यासंदर्भात तातडीने कार्यवाही करावी व याबाबत केलेल्या कार्यवाहीचा अहवाल समितीला एक महिन्यात सादर करावा.

२. विधानसभा आश्वासन समितीने केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने विभागामार्फत यापूर्वी वेळोवेळी सर्व मंत्रालयीन विभागांना संदर्भाधीन अनुक्रमांक १ व २ येथील परिपत्रकान्वये सूचना देण्यात आल्या आहेत. तरी, विधानसभा आश्वासन समितीने त्यांच्या नवव्या अहवालात निदेशित केलेल्या वरील नमूद शिफारशींचे गांभिर्याने अनुपालन करण्याची दक्षता सर्व मंत्रालयीन विभागांच्या सचिवांनी घ्यावी व त्याबाबत केलेल्या कार्यवाहीचा अहवाल समितीला एक महिन्यात सादर करण्यात यावा.

प्रस्तुत परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१८०८२०१६०५११६११५ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Rajendra Gajanan Bhagwat

Digitally signed by Rajendra Gajanan Bhagwat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cc7aabd81415b8f5527e47fcdf6cb267b325f7490f2a874918347994ab7f727a, serialNumber=d818186dee70df53c608510c8f5de9e22be5a193d4a6472ca4de45a568dc44a7, cn=Rajendra Gajanan Bhagwat
Date: 2018.08.20 16:07:25 +05'30'

**(राजेन्द्र ग. भागवत)**
**सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव
२) सर्व मंत्रालयीन विभाग
३) प्रधान सचिव / सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई-४०० ०३२. *(पत्राद्वारे)
४) निवड नस्ती.